**महाराष्ट्र राज्य लॉटरी**
**महाराष्ट्र दसरा भव्यतम सोडतीची बक्षिस रचना व कार्यपध्दतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः मरालॉ- २०२१/ प्र.क्र.६०/ लॉटरी-२**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ सप्टेंबर, २०२१.

वाचा : उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवीमुंबई यांचे पत्र क्र. उपसं (वि व ले)/मरालॉ/ योजना / २३७८/२१, दि.०७/०९/२०२१.

**शासन परिपत्रक :**

महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या विविध लॉटरी सोडती केंद्र शासनाचे लॉटरी (विनियमन) अधिनियम १९९८ व लॉटरी (विनियमन) नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित केल्या जातात. त्या प्रमाणेच महाराष्ट्र दसरा भव्यतम सोडत दिनांक १६ ऑक्टोबर, २०२१ रोजी सायंकाळी ४.०० वाजता काढण्यात येईल.

२. महाराष्ट्र दसरा भव्यतम सोडत या सोडतीच्या तिकीटांचे मूल्य रू. १००/- (GST सहीत) असून पहिले सामायिक बक्षिस (पूर्ण क्रमांक) रू. २५,००,०००/- ठेवले असून पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित नऊ मालिकांमधून रू.२,००,०००/- चे दुसऱ्या क्रमांकाचे सामायिक ( पूर्ण क्रमांक) बक्षिस ठेवण्यात आले आहे. या सोडतीत एकुण १० मालिका असून प्रत्येक मालिकेत १० हजार तिकीटे या प्रमाणे एकूण १ लाख तिकीटे मुद्रीत करण्यात येणार आहेत. प्रत्येक मालिकेतील तिकीटांचे क्रमांक ०००० ते ९९९९ या प्रमाणे देण्यात आलेले आहेत.

३. या सोडतीची तिकीट विक्री उपसंचालक (वि. व ले.),वाशी,नवीमुंबई कार्यालयामार्फत करण्यात येईल. त्यानुसार **महाराष्ट्र दसरा भव्यतम** या सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि. व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, १ला मजला, वाय-अे १, अतिरिक्त शॉप कम गोडाऊन, ए.पी.एम.सी. मार्केट,सेक्टर १९-बी, वाशी,नवीमुंबई-४००७०५ येथून विक्रेत्यांना उपलब्ध होतील. या सोडतीची तिकीट विक्री फक्त महाराष्ट्र राज्यातच करण्यात येईल. तसे तिकटांवर छापण्यात येईल.

४. या सोडतीची तिकीट विक्री करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांचे एका पुस्तकावरील (M.R.P. Rs.१००/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर खरेदी करण्यात आलेल्या या सोडतीच्या एकूण लॉटरी तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर [वस्तु व सेवा करासह (GST)] पुढील प्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| अ.क्र. | तिकीटांची संख्या | अनुज्ञेय घाऊक सूट |
|---|---|---|
| १ | ५०० ते १०००० तिकीटे | १८% |
| २ | १०००१ ते २०००० तिकीटे | २२% |
| ३ | २०००१ ते ५०००० तिकीटे | २५% |
| ४ | ५०००१ ते १००००० तिकीटे | २६% |

जे घाऊक विक्रेते सोडतीच्या प्रत्यक्ष खरेदी करतील त्या एकूण तिकीटांच्या संख्येवर (Actual number of total tickets purchased ) २% (GST वगळून) विशेष सूट देण्यात येईल. या बाबतच्या अटी व शर्ती, शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांक मरालॉ २०१२/प्र.क्र.४७ / लॉटरी -२, दिनांक ०८/०५/२०१२ नुसार लागू राहतील.

५. या सोडतीच्या तिकीट छपाईचे आदेश उपसंचालक (वि. व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, १ ला मजला, वाय-अे १, अतिरिक्त शॉप कम गोडाऊन, ए.पी.एम.सी. मार्केट,सेक्टर १९-बी, वाशी,नवीमुंबई या कार्यालयाकडून स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. या सोडतीची तिकीट छपाई मे. साई सिक्युरिटी प्रिंटर्स प्रा. लि.,फरीदाबाद यांचेकडून करून घेण्यात येईल. या तिकीटाचे आकारमान २४ x १४ cms असून यासाठी १३० GSM Indian Art Paper वापरण्यात येऊन छपाईचा दर रू.२७१/- प्रती चौ. से. प्रती लाख तिकीटे, असा राहील.

६. महाराष्ट्र दसरा भव्यतम सोडत या सोडतींची बक्षिसरचना -

मालिका -१० — प्रत्येक मालिकेत १०००० तिकिटे

तिकीटांचे क्रमांक ०००० ते ९९९९ — एकूण तिकिटे १ लाख

सोडत दिनांक- **१६ ऑक्टोबर, २०२१** — तिकीटांची किंमत रू.१००/-

सोडतीची वेळ : सायं. ४.०० वाजता.

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम रू. | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम रुपये | एकूण विक्रेता बोनस |
|---|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक) बक्षिस (पूर्ण क्रमांक) | २५,००,००० | -- | १ | २५,००,००० | २५,००० |
| दुसरे (सामायिक) बक्षिस (पूर्ण क्रमांक) (पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित ९ मालिकांमधून ) | २,००,००० | -- | १ | २,००,००० | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| तिसरे बक्षिस ( पूर्ण क्रमांक) (प्रत्येक मालिकेसाठी) | १०,००० | १ | १० | १,००,००० | |
| चौथे बक्षिस ( पूर्ण क्रमांक) (प्रत्येक मालिकेसाठी) | ५,००० | १ | १० | ५०,००० | |
| पाचवे बक्षिस ( पूर्ण क्रमांक) (१० क्रमांक) (सर्व मालिकांसाठी) | २,००० | १० | १०० | २,००,००० | |
| सहावे बक्षिस ( पूर्ण क्रमांक) ( १० क्रमांक)(सर्व मालिकांसाठी) | १,००० | १० | १०० | १,००,००० | |
| सातवे बक्षिस ( पूर्ण क्रमांक) ( १० क्रमांक)(सर्व मालिकांसाठी) | ५०० | १० | १०० | ५०,००० | |
| आठवे बक्षिस (कोणतेही पूर्ण अंकाचे ७०० क्रमांक सर्व मालिकांसाठी ) (Random पध्दतीने) | २०० | ---- | ७००० | १४,००,००० | |
| | | **एकूण :-** | **७३२२** | **४६,००,०००** | **२५,०००** |

७. घाऊक विक्रेत्याने ज्या किरकोळ विक्रेत्यास तिकीटे विकली असतील त्या किरकोळ विक्रेत्यांची यादी घाऊक विक्रेत्याने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या, वाशी, नवी मुंबई या कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

८. <u>सोडतीची कार्यपध्दती :-</u>

**महाराष्ट्र दसरा भव्यतम सोडत** या सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ५ ड्रम्स ठेवले जातील. प्रत्येक मालिकेमध्ये ०००० ते ९९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकांचे अद्याक्षरे/क्रमांक असतील. उर्वरित ४ ड्रम्समध्ये ० ते ९ अंकाची प्रत्येकी एक चकती याप्रमाणे १० चकत्या ठेवण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील.

(१) <u>तिसरे बक्षिस रू. १०,०००/-</u> तिसऱ्या रु. १०,००० च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा एक क्रमांक याप्रमाणे प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या एक क्रमांक काढण्यात येईल. ज्या तिकीटामध्ये असा क्रमांक आला असेल, अशी सर्व तिकीटे रू. १०,०००/- च्या तिसऱ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(२) चौथे बक्षिस रू. ५,०००/- चौथ्या रु. ५,०००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा एक क्रमांक याप्रमाणे प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या एक क्रमांक काढण्यात येईल. ज्या तिकीटामध्ये असा क्रमांक आला असेल, अशी सर्व तिकीटे रू. ५,०००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(३) पाचवे बक्षिस रू. २,०००/- पाचव्या रु. २,०००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा एक क्रमांक याप्रमाणे १० क्रमांक स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटामध्ये असा क्रमांक आला असेल, अशी सर्व तिकीटे सर्व मालिकांसाठी रू. २,०००/- च्या पाचव्या बक्षिसासाठीपात्र असतील.

(४) सहावे बक्षिस रू. १,०००/- :- सहाव्या रु. १,०००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा एक क्रमांक याप्रमाणे १० क्रमांक स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटामध्ये असा क्रमांक आला असेल, अशी सर्व तिकीटे सर्व मालिकांसाठीरू. १,०००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(५) सातवे बक्षिस रू. ५००/- :- सातव्या रु. ५००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा एक क्रमांक याप्रमाणे १० क्रमांक स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटामध्ये असा क्रमांक आला असेल, अशी सर्व तिकीटे सर्व मालिकांसाठी रू.५००/- च्या सातव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(६) आठवे बक्षिस रू. २००/- :- आठव्या रु. २००/- च्या बक्षिसासाठी संगणकावर पूर्ण अंकाचे ७०० क्रमांक स्वंतत्ररित्या रॅन्डम पध्दतीने काढण्यात येतील व ते क्रमांक सर्व मालिकांसाठी रू.२००/- च्या आठव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(७) **पहिल्या क्रमाकांचे (सामायिक) रू. २५,००,०००/- चे बक्षिस काढण्याची कार्यपध्दती :-**

"महाराष्ट्र **दसरा** भव्यतम" या भव्यतम सोडतीमध्ये दहा मालिकांत मिळून रूपये **२५** लाखाचे पहिले (सामायिक) बक्षीस ठेवण्यात आले आहे. प्रथमत: दहा मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची आद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रम मध्ये ठेवली जाईल . अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी(पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ८ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने पूर्ण क्रमांकाचा एक भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल..

(८) **दुसरे (सामायिक) बक्षिस रू. २,००,०००/- चे बक्षिस काढण्याची कार्यपध्दती :-**

" महाराष्ट्र दसरा भव्यतम " या सोडतीमध्ये दहा मालिकांमधून पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित ९ मालिकांमधून रुपये दोन लाखाचे दुसरे (सामायिक) बक्षीस ठेवण्यात आले आहे. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर ड्रम मध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी (पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर

काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ८ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने दुसऱ्या बक्षिसाचा भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

९. या सोडतीच्या तिकीट छपाईचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी १६ प्रकाशने व बक्षिस विजेत्या तिकीटांचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००)१०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२)(००)(०१) प्रमुख लॉटरी ०५ बक्षिसे या लेखाशिर्षामधील उपलब्ध तरतूदींतून भागविण्यात यावा.

**१०.** पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

**११.** या सोडतीमध्ये कोणत्याही मालिकेमध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

**१२.** या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

**१३.** महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखादया बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक काढण्यात येत असतील अशावेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक / एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास नंतर काढलेले क्रमांक रद्द करुन त्या ऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

**१४.** या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

तसेच संगणकातील तांत्रिक बिघाड, विजपुरवठा खंडीत, नैसर्गिक आपत्ती इ. कारणांमुळे जर सोडत काढता आली नाही तर ती सोडत दुसऱ्या दिवशी काढून निकाल जाहिर करण्यात येईल.

**१५.** सदरच्या सोडतीची कार्यपध्दती पूर्ण झाल्यानंतर शासनाच्या विहित तरतूदीं / कायद्यानुसार या सोडतीच्या निकालाची प्रसिध्दी शासनाच्या राजपत्रात करण्याची कार्यवाही उपसंचालक (वि.व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, १ला मजला, वाय-अे १, अतिरिक्त शॉप कम गोडाऊन, ए.पी.एम.सी. मार्केट, सेक्टर १९-बी, वाशी,नवीमुंबई-४००७०५ या कार्यालयाकडून करण्यात येईल व याबाबतची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहिल.

**१६.** भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाचे Notification No.**4/2017-** Central Tax (Rates) दिनांक २८/०६/२०१७ मध्ये पुढील प्रमाणे तरतुद आहे.

| **Sr. No.** | **Tariff item, sub-heading, heading or chapter** | **Description of supply of Goods** | **Supplier of goods** | **Recipient of supply** |
|---|---|---|---|---|
| 5. | -- | Supply of lottery | State Government , Union Territory or any local authority | Lottery distributor or selling agent. *Explanation*.- For the purposes of this entry. lottery distributor or selling agent has the same meaning as assigned to it in clause (c) of Rule 2 of the Lotteries (Regulation) Rules, 2010, made under the provisions of sub-section I of section II of the lotteries (Regulations) Act, 1998 (17 of 1998). |

केंद्र शासनाचे लॉटरी (विनियमन) नियम २०१० च्या नियम २ (c) मध्ये “distributor or selling agent” means an individual or a firm or a body corporate or other legal entity under law so appointed by the Organizing State through an agreement to market and sell lotteries on behalf of the Organizing State” असे नमूद आहे. तथापि, सदर तरतुदींनुसार महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या पारंपारिक लॉटरी सोडतींच्या तिकीट विक्रीसाठी शासनाने करार करून कोणीही अधिकृत विक्रेता नियुक्त केलेला नाही. त्यामुळे वरील नमूद नोटीफिकेशन मधील तरतुदींनुसार अधिकृत वितरक / विक्रेता वस्तु व सेवा कर भरणा करण्यासाठी आस्तित्वात नाही. अशा परिस्थितीत वस्तु व सेवा कर वसूल करून भरण्यासंदर्भात आयुक्त, वस्तु व सेवा कर कार्यालयाने पुढील प्रमाणे स्पष्टीकरण दिलेले आहे.

“ If State Government supplies these lottery Tickets directly to any person, who is not legally appointed/authorized as lottery distributor or selling agent as described in clause (c) of Rule 2 of the Lotteries (Regulation) Rules, 2010,- Tax shall be collected and shall be paid by State Government only, as aforesaid.”

तरी वरील स्पष्टीकरणानुसार महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या या प्रस्तावित सोडतींवरील लॉटरी तिकीटांच्या विक्रीवर तिकीट विक्रेत्यांकडून केंद्र शासनाच्या अधिसूचनेनुसार विहित केलेल्या दराने वस्तु व सेवा कर वसूल करून विहित पध्दतीने शासनाकडे भरण्याची कार्यवाही उपसंचालक (वित्त व लेखा),महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवीमुंबई यांनी करावी व याबाबतची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहिल.

**१७.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२१०९२२१२४९३६१३०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TANAJI RAGHUNATH PAWAR

Digitally signed by TANAJI RAGHUNATH PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9fb5ee9e082c5be972b251ab6848d0c9186e8961bdfcbf9861251eb62d191d6c, pseudonym=6AEFE1149F309520C37075C4408EE4CDAFC5BA11, serialNumber=94ED5C5700A6EE0BEA70FD85BD77F8CC88E76B4D59B8BD74C71EF53EC941A59D, cn=TANAJI RAGHUNATH PAWAR
Date: 2021.09.22 12:50:45 +05'30'

**( ता. र. पवार )**
कार्यासन अधिकारी तथा
राज्य लॉटरी अधिकारी,
वित्त विभाग.

**प्रति,**

१. मा. मंत्री ( वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, (गृह),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२.
११. सह सचिव (राज्य लॉटरी) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी,वाशी, नवीमुंबई.
१५. कक्ष अधिकारी, प्रशा-४/लॉटरी-३/ अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. लेखाधिकारी, लॉटरी संचालनालय, मुंबई.
१७. निवड नस्ती, लॉटरी -२.